*Bal Bodh Goshti*

# बाळबोधगोष्टी.

पाद्री फ. गारसाहेब यांचें मडमसाहेबांनीं केलें

त्याची नववी आवृत्ति ही

पाठशाळेकडील छापखान्यांत

छापिली.

---

मुक्काम पुणें.

छापणार नारोराम चंद्र ठकार मु० छा०

---

इसवी सन १८५६

शके १७७८

# अनुक्रमणिका


| धडे | | पृष्ठ. |
|---|---|---|
| १६ | वाजर | ४९ |
| १७ | बीवर | ५१ |
| १८ | उंदीर | ५४ |
| १९ | ग्वार | ५६ |
| २० | ससा | ५९ |
| २१ | उंट | ६१ |
| २२ | हरिण | ६५ |
| २३ | बकरा | ६८ |
| २४ | मेंढा | ७० |
| २५ | बैल | ७२ |
| २६ | घोडा | ७६ |
| २७ | गाढव | ८१ |
| २८ | जेब्रा | ८५ |
| २९ | डुकर | ८८ |




# धडा १



## वानर.



क्य ऋ त्क त्य त्व न्न प्य प्र

र्य र्व ल्य क्र ष्ण स्व म्ह व्य

त्वरेनें सर्व तडाक्यास

आपल्या. उष्ण छाति

दुसऱ्या तेव्हां म्हणून

वानर फार चमत्कारिक जनावर आहे. याचा आकार कांहींसा माणसा सारिखा दिसतो, व माणसाचें करणें पाहून त्याप्रमाणें हा करितो. याचा स्वभाव खोरटा व आंगीं चपळता

भारी आहे. उंच झाडावर त्वरेनें चढ-णें, उडी मारणें, हें ह्याला सहज. ह्याचें राहाणेंही झाडावरच. ख्याणें तरफळें पाला आहे. अमेरिका देशांत वानरांची एक जात आपल्या लांब शेपटीचा विळखा एका डाहाळीस घालून दुसऱ्या डाहाळीवर उडी मारिती. तसाच लहान जिन्नस शेपटीनें ओढून आपल्या जवळ आणती. वानर बहुत करून कळपांत राहातो.

वानरांच्या एका जातीस रान माणूस म्हणतात. त्याचे हात, पाय, तोंड, कान, हें सर्व माणसा सारिखें असतें. तो बहुतकरून दोहों पायांवर उभा ग-

हून माणसा सारिखा चालतो. ज्या देशां-
त हवा उष्ण आहे तेथें सांपडतो. का
ळ्या किंवा भुऱ्या किंवा उदी रंगाचा
असतो. तो आपल्या वयांत येतो ते-
व्हां चार हात उंच असतो; रानमाणू-
स बळकट, क्रूर, आणि धीराचे आहे-
त. रानांत जर माणूस त्याचे नजरे-
क्यास सांपडला तर ते त्याला मारिती-
ल. फळें मुळें मिळतनाशीं होतात ते-
व्हां दर्या किनाऱ्यास जाऊन कालवें, खे
कडे, शिंपीतले जीव, असे खातात. रा-
नमाणूस मानसाळला असतां त्याची
कृति फार मौजेची होती. एका साहे-
बापाशीं त्यांचें एक जोडपें होतें. ती

दोघें साहेबलोकां सारिखें हातांत सु-
री काटा घेऊन मेजावर खाणें खात
असत. प्याल्यांतून पाणी पीत असत.
जें आपणाला पाहिजे तें चाकरलोकां-
कडे खुणेनें मागत, तें जर त्यांनीं न-
दिल्हें तर चाकरांला मारीत. एकवेळ
त्या दोघांतून एक आजारी पडला, म्ह-
णून त्याची साहेबानें शीर काढिली,
तेव्हांपासून ज्यावेळीं त्याला कांहीं वि-
कार होई, त्यावेळीं तो आपला हात
शीर काढावयासाठीं लांबवून दाखवी.

## धडा २

### हत्ती.

ज्य ण्ह त. त्य घ प्य ल्ल ल्य

व्ह स्त्य स्त्व स्थ म्ह

सर्वांहून. म्हणजे. दिल्ली.

त्यांच्या. आपल्या. शिंप्याच्या.

रस्त्यावर. स्वस्थ. कोण्ही.

हत्ती हें सर्वांहून मोठें जनावर आहे. ह्याचा एकेक पाय एकेका मुला एवढा मोठा आहे. हत्ती बळकट किती आहे पाहा, साहा किंवा आठ घोड्यांनीं वाहावयाचें ओझें एकटा वाहातो. ह्याला दोन लांब सुळे येतात, त्यांला हस्तीदंत म्हणतात. ह्याच्या

तोंडावरती सोंड आहे, ती त्याला हाता सारखी कामास पडती. तिनें गवत उपडून व झाडाच्या खांद्या मोडून खा-तो, व तींत पाणी घेऊन तोंडानें पितो. हा फार शहाणा असतो, महात सांगे-ल त्याप्रमाणें करितो. हा मोठा आहे खरा, पण लहानशा अंकुशानें दब-ला जातो. उपकार व अपकार फार मानितो. अरे मुलांनो तुम्ही उपकार माना, पण हत्ती मारिखा अपकाराचा सूड घेऊं नका.

अजमीर नगरांत एक हत्ती अ-से, त्याची फिरावयास जावयाची वाट बाजारांतून होती, तेथें एक बायको

भाजीची पांटी पुढें ठेवून, रस्त्यावर विकावयास बसे, आणि तो हत्ती ति-च्या जवळून जाऊं लागला, म्हणजे ति-नें त्याला एक भाजीची जुडी द्यावी. एके दिवशीं हत्तीला मोठा राग आला, आणि सांखळदंड तोडून, महाता वांचून तो बाजारांतून पळून जाऊं लागला. तेव्हां त्याला पाहून लोक चहूंकडे पळाले; त्यां-बरोबर ती भाजीवालीही पळाली. ति-च्या पांटीजवळ एक लेंकरूं होतें, त्याला ती भयानें विसरून गेली. पण हत्तीनें आपल्या उपकार करणारीची जागा ओळखून, त्या लेंकराला न दुखविता, सोंडेंत घेऊन, रस्त्यांतून दुकानावर

नेऊन स्वस्थ ठेविलें.

दिल्ली शहरांत एक हत्ती रस्त्या-वर फिरत होता, त्यानें एका शिंप्याच्या दुकानांत सोंड घातली, तेव्हां कोणी त्याच्या सोंडेला सुई टोंचली. तें सोसून. तो उगाच पुढें गेला. आणि रस्त्यांतलें घाणेरें मोरीचें पाणी सोंडेंत घेऊन, परतून दुकाना जवळ आला, तेथें तें पाणी फुंकून शिंप्याचें काम त्यानें अगदीं नासून टाकिलें.

## धडा ३

## कुत्रा.

ख्य ट्यं ज्य ण्य त्र ध्य न्य प्र म्य र्व
र्न र्थ ऱ्ह ल्य व्ह क्ष ष्ट स व्य.

मुख्य. भिकाऱ्याच्या. घरवाल्याचा.
वाऱ्यासारिखी. उदम्याच्या. फेऱ्या.
धन्याला. बिऱ्हाड. जेव्हां.

कुत्रे सर्व देशांत सांपडतात. यांत जाती बहुत आहेत. कितीएक देशांत कुत्रे अनेक कामें करितात, पण यांचें मुख्य काम माणसांची चौकी पाहारा आणि माणसां बरोबर शिकारीस जाणें. हे धांवणारे चांगले. रानपशूशीं लढाई

करावयास यांचे दोन व नरवें, ह्या सारखी आहेत. ह्यांला चांगले गुण ला-वावयास किंवा भलतें काम शिकवाव-यास, सोपें आहे. कुत्रे केवळ हुकमी व इ-मानी चाकर असतात. धन्यानें जिकडे छु केलें त्या सरसे तिकडे जातात, आ-णि धन्याचें हित करावयासाठीं, प्रसंगीं आपला प्राणही खर्च करितात. कुत्रे धन्याच्या आर्जवाविषयीं फार सादर असतात. ह्यांची उपकार व प्रीति कर-ण्याची गोष्ट सांगतों.

रोम म्हणजे इताली देशाचें मुख्य शहर, त्यांत एक आंधळा भिकारी रा-हात होता. त्याचा कुत्रा त्याला माणसा

मारिख्वा वांटवरून चालवी. व ज्या-
च्या घरीं पैसे मिळावयाचे त्याच्या
घरीं धन्याला घेऊन उभें करी; समयीं
कोणी दुरून पैसा भुईवर उडविला
असतां, तो शोधून भिकाऱ्याच्या भिक्षा-
पात्रांत घाली; तसाच खावयाचा पदा-
र्थ जरी भुईवर टाकिला तरी तो घेऊन,
कुत्रा धन्याच्या स्वाधीन करी, आणि ध-
न्यानें दिल्यावांचून तो आपण कांहीं
खात नसे.

एका उदम्याच्या घरीं कोणी मा-
णूस बिऱ्हाड मागावयासाठीं आला आ-
णि एक खोली भाड्यानें कबूल करून
मी आज सायंकाळीं माझी पेटी ह्या खो-

लीन ठेवावयास पाठवून देतों." असें सांगून गेला, आणि त्यानें त्याप्रमाणें केलें. मग ती पेटी खोलींत ठेवल्यावर, घरवाल्याचा कुत्रा पेटी सभोंवती फे-र्‍या घालून मोठ्यानें भुंकूं लागला. ध-न्यानें त्याला पुष्कळ चुप! च्युप! करू-न धमकाविलें, तरी तो ती जागा सोडी-ना. तेव्हां उदम्याच्या मनांत कांहीं पेटी-चा संशय येऊन त्यानें शेजाऱ्यास बो-लाविलें, आणि त्याच्या समक्ष पेटी उ-घडून पाहिलें, तों तिजमध्यें एक चोर, त्या रात्रीं घर लुटावयाचा मनसुबा करून राहिलेला असा सांपडला.

एक माणूस एका शहरा बाहेर ग-

हात असे, त्याला जेव्हां गरज लागे तेव्हां कुत्र्याला गळ्यास चिठी बांधून, नित्याच्या उचापत देणाऱ्याच्या दुकानीं पाठवून देई; आणि कुत्रा जिन्नस घेऊन येई.



## धडा ४

### न्युफौंदलांद कुत्रा.

क्य ण्य न्न त्य त्र च्य
न्द न्य प्र र्य ल्य म्ह.

जात्या. प्रीति. न्युफौंद०
पाण्यांत. मुक्या. कुत्रीं.
कितीएक. पोसणाऱ्याचे. म्हणजे.

अमेरिकेच्या उत्तरेकडे ज्या देशास न्युफौंदलांद, म्हणजे नवा सांपडलेला देश असें म्हणतात, त्यांत हा कुत्रा सांपडतो. अंगानें मोठा व मजबूद, आणि जात्या गरीब असतो. ह्यांला शिकवावयाचें सोपें आहे. पाण्यांत पोंहावयाची फार ह्याला आवड. ह्यानें कितीएक वेळां बुडणाऱ्या माणसांला बाहेर काढून, त्यांचा प्राण वांचविलेला आहे. हा आपल्या धन्यावर फार प्रीति ठेवितो. ज्यानें आपल्यावर उपकार केला असेल त्याचा हा अनेक उपायांनीं फेडितो. लेंकरांनो, ह्या मुक्या जनावराचे गुण तुम्ही लक्षांत आणा, आणि आपल्या

शिकविणाऱ्याचे व पोसणाऱ्याचे उपकार मानून, त्यांच्या आज्ञेंत चालो.

न्युफौंड्लांडदेशीं ह्या कुत्र्याला गाडीला जुंपतात. चार कुत्रीं गाडीला लाविलीं असतां रानांतून लांकडें भरलेली गाडी आणितात; आणि गाडी रिकामी केली म्हणजे फिरून घेऊन आपल्या आपण रानांत जातात. ह्यांला कामाचा मुशारा इतकाच कीं तेथें ह्याला काम घेणाऱ्यापासून खाणें मिळतें. हीं कुत्रीं पाणी भरावयाच्या कामासही पडतात; गाडींत पीप ठेविलें म्हणजे गाडी घेऊन पाण्यांत जातात, आणि तें भरल्यावर ह्यांच्या संगतीं मुलगा अस-

तो तो ह्यांला हांकितो, म्हणजे हीं गाडी घरीं आणितात.



## धडा ५

## लांडगा

क्य क्र ग्य ग्ल ढ्य त्य त्र्य द्य प्र
भ्य र्क र्व र्ष व्य ह्न ष्क स्व म्ह.

स्वभाव. भ्याड. प्रतिवर्षी
क्रूर. पूर्वी. हलक्या.
रात्रीस. पुष्कळ. घाब्या.

लांडग्याचें रूप कुत्र्यासारिखें दिसतें, पण स्वभाव त्याहून अगदीं निराळा आहे. हा फार क्रूर आहे म्हणून को

कांला आवडत नाहीं. दिवसास हा रा- नांत राहातो, आणि रात्रीस हळूच गावा तशिरून लोकांचीं कोंबडीं, बकरीं, मारि तो. हा कांहीं माणसाच्या उपयोगी नव्हे, पण त्याचें कातडें, थंड देशांत, कामास येतें. हा ठक आणि भ्याड आहे, म्हणून त्याला धरावयाचें कठीण पडतें.

लांडगे कळपांत राहातात. जेथें हवा कांहीं थंड असती तेथें सांपडतात. इंग्लंडांत पूर्वी लांडगे पुष्कळ असत, आणि मेंढ्यांच्या कळपांचा फार नाश क- रीत. त्या नाशकांला नाहींसें करावें, म्ह- णून त्या वेळच्या एद्गार राजानें उपाय योजून, त्यानंतर नवा कर बसाविला, की

सरकारास प्रतिवर्षीं लांडग्यांचीं अमुक डोकीं द्यावीं; व कांहीं हलक्या अमुक अपराधाच्या दंडाबाबद, लांडग्याच्या अमुक जिभा द्याव्या. तेव्हांपासून इंग्लंडांत लांडगे अगदीं नाहींसे झाले.

---

## धडा ६

## तरस.

क्ष ग्र च्च ट्ट ट्टय ट्य त्क त्य
त्र न्ह प्र ब्द र्द र्व ल्य ल्ह
ष्य स्त स्य स्म स्व म्ह ह्य

निर्दय. पट्यांचा. मस्त.
शब्द. मनुष्यांचा. तत्काळ.

प्रकार. गोष्ट. अपूर्व.
ठिबक्यांचा. लष्करी. अकस्मात्.

नरस, काफरी लोकांच्या देशांत, फारशी देशांत, व ह्या हिंदुस्थानांत सांपडतो. हा वनपशु निर्दय आहे, वह्याचा जबडा अतिशय बळकट आहे. बैलाचा पाय तडाक्यास सांपडला तर हा सहज दाढेनें मोडील. रानांत रात्रीस हा आपला भक्ष मिळवितो; दिवसास आपल्या बिळांत राहातो, जीं बिळें मोठीं आहेत, त्यांला गुहा म्हणतात. नरसांत दोन प्रकार आहेत. एक ठिबक्यांचा आणि एक पट्यांचा. ह्या दोन्हीं जाती स्वभावानें फार उग्र

आहेत. हे प्रसंगीं मेलेलीं जनावरें किं-
वा पुरलेला मनुष्याचा मुर्दा देखील उ-
करून खातील. तरसाच्या मानेचे
सांधे घट्ट आहेत. सहज वळत नाहींत,
म्हणून मागें पाहातांना त्याला आंग फि-
रवावें लागतें. त्याची चाल कांहींशी लं-
गडी, आणि शब्द कांहींसा माणसाच्या
शोक शब्दा सारिखा आहे.

एक ऐकींव गोष्ट अशी आहे कीं
केपास एक लष्करी तुतारजी दारू पिऊन
मस्त होऊन रात्रीचा रस्त्यावर पडला
होता, त्याची तुतारी कंबरेस बांधलेली
होती. तेथें तरसानें येऊन त्याला ओढू-
न आपल्या बिळाजवळ नेलें. तेव्हां तर-

झाला पाहून तुतारजीची भयानें तत्का
ळ गुंगी उतरली, आणि लोकांनीं धा-
वणें करावें म्हणून आपली तुतारी
त्यानें मोठ्यानें वाजिवली. तिचा अपूर्-
व नाद ऐकुन तरस अकस्मात् पळून
गेला.



## धडा ७

## खोंकड.

ह्न ग्ल च्य त्य त्र त्र्य प्त प्र

द्ध ल्ह्य

ह्नानि. रानमूढ्या कुतरीं.
कोल्ह्यासारिखी. डसल्या. प्राप्त.

इत्यादिक. इंग्लंडांत. कुत्र्यासारिखा

ह्याचा आकार व कृति कोल्ह्यासारिखी आहे. हा बहुधा देशोदेशीं सांपडतो. आपला भक्ष असेल तेथें जवळ च बीळकरून राहातो, कोंबडीं, बदकें, मसे, इत्यादिक मारितो, आणि हें कांहीं न मिळालें तर उंदीर, दिवड, बेडूक, नाहींतर रानमुळ्या, असें खातो. हा फारच ठक आहे. कोणी नाहींसें पाहून फटकन कोंबडें धरितो, भूक नसली तर लमवून ठेवितो. ह्याला मधाची आवड फार आहे. जर कोठें मध सांपडला तर हा मधमाशा आंगास डसल्या तरी सोडीत नाहीं. भुईवर लोळून फिरून उठून मध खातो.

इंग्लंडांत पारधी कुतरीं घेऊन ह्याच्या शिकारीस जावयाला लोकांला मौज वाटती.

एकदां कितीएक कुतरीं खोंकडाच्या मादीचा पाठलाग करून तिच्या विळा जवळ गेलीं, तेव्हां ती आपलें पोर तोंडांत घेऊन कोसभर जिवाच्या आकांतानें पळाली. पण तिकडून एक कुतरु समोर आंगावर आला, तेव्हां पोराला सोडणें तिला प्राप्त झालें. खोंकडाचा शब्द कांहींसा कुतऱ्या सारिखा आहे.

# धडा ८

## सिंह

क्र क्य क्त क्क क्ल ग्ल ठ्य ड्य
त्य त्र द्य द्र न्म न्य म्र ब्द
र्ज र्व ल्ह भ्र म्ह ष्क स्त्र स्त
स्न स्व ळ्य.

पराक्रम. अटव्यरानांत.
शक्ति. मुद्रा.
आकाशांतल्या. आंगवस्त्राची.
मावळ्यावर. स्नेहभाव.
एरवीं. तऱ्हांची.
सौम्य. श्लाघ्यातोर.
घावा. हिंस्र

उपद्रव. मरणोन्मुख.
आंद्रोक्लेज. दंडमुक्त.

सिंह, सर्वपशूंचा राजा म्हटला आहे. कांकीं ह्याचा पराक्रम थोर, शक्ति मोठी, आकार चांगला असतो. ह्याचा शब्द आकाशांतल्यागडगडाटासारिखा आहे. हा रानांत राहातो, दिवसभर उगाच असतो, आणि दिवस मावळ्यावर आपला भक्ष मिळवावयास निघतो. ह्याला भूक लागली असतां हा खावयापुरतें एक दुसरें जनावर मात्र मारितो, पण हा एरवीं क्रूर नव्हे, सौम्य आहे, ह्याच्या पायाच्या एका फटक्यानें घोड्याची कंबर मोडती, आणि शेपटीच्या तडाक्यानें माणूस

खालीं पडेल. सिंह बहुतकरून काफ्री लोकांच्या देशांत सांपडतो.

सिंह धरून बाळगावयास माण सांचे उपाय चालतात. युरोपांत लोकांला दाखवावयासाठीं कोणी कोणी त्याला बाळगतात. फ्रेंचलोकांच्या राजापाशीं सिंह व सिंहीण अशीं दोघें होतीं. तीं आपल्या राखणाऱ्यावर फार प्रीति करीत; तो जसेजसें सांगे, "नीज, ऊट, बैस, ये, जा," तसतसें करीत; त्यानें कदाचित् मान किंवा टाळा दाखीव, किंवा हात दे, असें म्हटलें तर तसें करीत. शेवटीं सिंहाला देणगी इतकीच कीं राखणाऱ्यानें आपला हात चाटूं पा-

वा. एकदां राखणारा दुखण्यास पडला, तेव्हां सिंह कोणाच्या हातचें खाईना, आणि कोणीजवळ आला तर मोठ्यानें ओरडून राग दाखवी. लोक समजले कीं हा आजारी आहे, पण सांपळ्यांत जावयाला कोणाला धीर होईना. मग राखणारा बरा झाल्यावर त्यानें येऊन सांपळ्यांत डोकी घातली, तेव्हां त्याला पाहातांच सिंहानें खुशाल होऊन त्याच्या गालाला चाटून, पायानें त्याला थोंपटलें.

इंग्लंडांत राजापाशीं असलीं जनावरें पुष्कळ आहेत. तेथें टवर म्हणून एक जागा आहे, त्यांत राजानें सिंह

बाळगला होता, त्याजपुढें एकेदिवशीं लहान कुत्रा मौजेनें कोणी टाकिला, पण त्या उदारपशूनें त्या गरिबाला कांहीं उपद्रव नकरून, उलटें त्याला आपलें खाणें खाऊं दिलें. मग तो कुत्रा बहुत दिवस त्याच्या सांपळ्यांत प्रीतीनें राहिला. सिंहाला खाणें दिलें म्हणजे कितीएकवेळां तो कुत्रा त्याच्या आंगावर भुंके, तरी सिंह कांहीं शासन नकरितां, त्याला आगोदर खाऊं देऊन मग आपण खाई.

पूर्वी आंद्रोक्लेज ह्या नांवाचा एक दास होता, तो आपल्या धन्याच्या घरून पळून एका अटव्य रानांत गेला,

आणि एका गुहेंत लपून रात्रीं निजला, उजेडतां वनपशूंचा मोठा शब्द कानांत पडून जागा झाला; आणि अधिकच जवळ शब्द ऐकूं येऊं लागला, म्हणून धडपडून उठून बसला; तों एक मोठा सिंह गुहेंत येत आहे, असें पाहून आंद्रोक्लेज भयानें कांपला, पण त्याची मुद्रा पाहून समजला कीं, हा कांहीं रागांत नाहीं, दुःखांत आहे. इतक्यांत तो सिंह लंगडत लंगडत त्याच्या जवळ येऊन ठेपला, तेव्हां त्यानें धीर करून, त्याचा लंगडा पाय उचलून पाहिला. आणि त्यांत कांटा होता, तो काढून, आपल्या आंगवस्त्राची धांदोटी फाडून त्याच्या

पांयाला बांधली, तेणेंकरून कांहीं चैन पडून सिंहानें आपली कृतज्ञता आर्जव पूर्वक त्याला दाखविली; आणि दोघांचा स्नेहभाव वाढून ते दोघे कितीएक दिवस त्या गुहेंत राहिले. नंतर लोक पारधीस गेले होते त्यांनीं आंद्रोक्लुजाला ओळखून धरिलें, आणि त्यास नेऊन त्याच्या धन्याच्या स्वाधीन केलें. त्यावेळीं नानातऱ्हांचीं श्वापदें धरून त्यांची लढाई लावावी, अशी त्या लोकांची रीति होती; आणि लोकांला तें पाहावयास मौज वाटे. त्यासाठीं पुष्कळ ठिकाणीं मोठमोठाल्या जागा बांधून, सभोंवतीं बसावयाला त्यांनीं उंच मंचके

लेले असत; आणि राजा, व मातबरलो-
क, वेळोवेळ हा तमाशा पाहावयाला त्या
जागीं जमत असत. श्वापदांशीं लढा-
ई करावयास, कांहीं जेठी बाळगले होते,
त्यांचें नांव ग्लाद्यातोर; व कधीं कधीं
अपराधीही श्वापदांपुढें टाकीत; म्ह-
णून आंद्रोक्लेजाच्या धन्यानें ठरविलें
कीं, त्याला श्वापदांपुढें टाकावें, मग ने-
मलेला दिवस आल्यावर दंड सोसाव-
यास त्यानें त्याला श्वापदांपुढें उभें के-
लें, तेव्हां तो बिचारा, त्या हिंस्रपशूंचे
शब्द ऐकून केवळ मरणोन्मुख झाला;
इतक्यांत बुभुक्षित पिसाळलेला, असा
एक मोठा सिंह त्याच्या आंगावर येऊं

लागला; पण अकस्मात् हा आपल्या गुहेंतला मित्र आंद्रोक्लेज असा ओळखून तो सिंह त्याचें आर्जव करूं लागला, तें लोकांला कौतुक वाटलें; मग आंद्रोक्लेज आपली पहिली झालेली गोष्ट सांगून दंड मुक्त झाला.

---

धडा ९

वाय.

क्य क्र च्य त्यं त्र प्र र्ग ष्क स्म स्म.

| | | |
|---|---|---|
| अवाक्यांत. | म्हशीच्या. | इतक्यांत. |
| प्रसंगीं. | रक्त. | छत्री. |
| पुष्कळ. | गर्जना. | अकस्मात्. |

वाघ, सर्वजनावरांपेक्षां क्रूर आहे. जर कोणीं माणूस किंवा पशु ह्याच्या अवाक्यांत आला, तर त्याला हा हटकून मारितो, झाडाखालीं जपणीस बसून त्याच्या पाठीवर उडी मारून मान पिळतो. हा इतका बळकट असतो कीं घोडा किंवा बैल ह्यास मारून तोंडांत धरून जंगलांत शिरतो. हा प्रसंगीं सिंहाशींही लढाई करील. ह्या देशांत वाघ पुष्कळ आहेत. कधीं कधीं गांवांतही येऊन गुरें, कुत्रीं, असें कांहीं सांपडलेलें मारितात. ह्याचें कातडें गोसावी आंगावर घेतात.

एका वी म्हैस चिखलांत रुतली

होती,-तिला काढावयासाठीं चार पांच माणसांनीं यत्न केला, पण ती निघेना, म्हणून दुसरीं माणसें आणावयास ते निघून गेले. ते परत येतात तों वाघानें येऊन म्हशीच्या मानेचें रक्त पिऊन तिला घेऊन तो चालला आहे, असें त्यांनीं पाहिलें.

बंगालदेशांत एके दिवशीं कांहीं साहेबलोक मौजेनें बाहेर फिरावयास गेले होते. ते सांजच्या वेळेस एका झाडाखालीं बसले असतां मेघासारिखी गर्जना करून त्यांच्या पुढें एक वाघ आला, आणि तो त्यांवर उडी घालणार इतक्यांत एका मडमीनें मोठी छत्री त्या-

च्या तोंडासरशी अकस्मात् उघडली तें त्याला भयंकर असें वाटून तो प ळाला.

---

धडा १०

बाऊल.

ग्र ग्ल च्च ज्ञ त्त ल्य ष्ट म्ह.

उत्तरेस. इंग्रेजी. इंग्लंडांत.

बाऊल म्हणून मांजरांत एक जात आहे, त्याला कोणी रानमांजर म्हणतात. हा घर मांजरापेक्षां मोठा व बळकट असतो, झाडांत राहातो

पांरवरें, ससे, कोंकरें, कोंबड्यांचीं पिलें असल्या लहान जीवांस मारून खातो. याची मादी झाडाच्या ढोलींत पिलें घालिती.

इंग्लंडाच्या उत्तरेस मोठ मोठे डाह आहेत. त्यांच्या कांठच्या रानांत बाऊल सांपडतात. त्यांला इंग्रजी वाघ ह्मणतात. कांतर त्या सारिखा घातक पशु इंग्लंडांत दुसरा नाहीं. ह्याविषयीं एक ऐकींव गोष्ट अशी आहे कीं बाऊलाची आणि माणसाची कांहींवेळ झटापटी होतां होतां शेवटीं एकमेकांला मारून मेले.

# धडा ११

## मांजर.

ख्य ग्य ग्र छ्र त्य त्र द्य न्य र्थ
र्म ल्य व्ह स्त स्व म्ह.

स्वभाव. पोशिंद्याचें. स्वच्छ. उग्र. निर्मळ. विस्तवासारिख्या. पदार्थापेक्षां. उद्योग. फुणग्या.

मांजराचा स्वभाव कांहीं उग्र आहे. इतर पदार्थांपेक्षां लहान जीव मारून खाणें ह्याला बरें वाटतें. त्यांला मारावयासाठीं ह्याचीं वाघा सारिखीं नखें आहेत, पण हें आपल्या पोशिंद्याचें आर्जव करितेवेळेस मखमाली सारिखीं

मऊ पावलें करितें. ह्याला कांहीं काळो-
खांत भणभणीत उजेडापेक्षां बरें दिस-
तें. म्हणून हें भक्षाची पारध बहुधा रा-
त्री करितें. त्यावेळीं हात पाय आंखडून
डोळे भक्षावरच लावून शेपटी हाल -
वीत बसतें. मांजर धांवणारें व झाडा -
वर चढणारें चांगलें आहे; वरून पडलें
तर पायांवर आंग सांवरतें. हें कुत्र्यासा-
रिखें माणसाळलेलें आहे; भेद इतकाच
कीं कुत्र्याला धनी आवडतो, मांजराला
धन्याचें घर मात्र आवडतें. हें घरांत
व कोठारांत उंदीर कमी करावयाच्या
उपयोगीं आहे. ह्याला आंग निर्मळ रा-
खावयाचा मोठा उद्योग आहे, हें जिभेनें

आंग स्वच्छ करितें. जेथें जीभ पोंचत नाहीं, तेथें हात जिभेनें ओला करून पुसतें. जेव्हां मांजराचे केंस अगदीं साफ व सुके असतात, तेव्हां काळोखांत त्यांजवर हात फिरविला असतां विस्तवासारिख्या बारीक फुणग्या निघतात.



## धडा १२

### लिंक्स.

क्य च्य त्त त्य त्र प्र र्य स्त म्ह.

तुऱ्यासारिखे. वस्ती. दुसऱ्या. लिंक्स. प्राचीन. मात्र.

लिंक्स म्हणून मांजरांत एक

जात आहे. हा कदाचित् कोळसुंदा असावा. युरोप, एशिया, अमेरिका, ह्यांच्या उत्तरेस हा सांपडतो. ह्याला थंड हवा बरी मानती. ह्याचे केंस सुंदर आणि बहुमोलाचे आहेत, त्यामुळें ह्याचें कातडें चिनीलोक रूसलोकांपासून विकत घेतात. हें जनावर सुमारें अडीच हात लांब होईल. ह्याचे कान उभे असतात. शेपटीचा गोंडाही काळा आहे. लिंक्स भलतीं लहान जनावरें मारून खातो. ह्याची वस्ती रानांत असती. ह्याला धरून बाळगावयास येत नाहीं. ह्याची नजर लांब आणि साफ आहे. म्हणून प्राचीन लोकांस वाटत होतें कीं भिंती-

च्या पलीकडचेंही ह्याला इकडून दिस-
नें. पण ह्याची नजर दुसऱ्या जनांवरांहू-
न साफ आहे इतकें मात्र खरें.

---

## धडा १२

## पाणमांजर.

च्य ण्य त्य ध्य न्य र्य ल्य श्य

श्र स्त स्थ म्ह क्ष्य.

हिंदुस्थान पाण्यामध्यें. अदृश्य.
आश्रयानें मजल्यांत पक्ष्याच्या.

पाणमांजर, युरोप, अमेरिका, हिं-
दुस्थान ह्या मुलकांत पाण्याच्या आश्र-
यानें सांपडतें, मासळी जेथें खावयाला

मिळती तेथेंच बीळ उकरून बिळाचें तोंड पाण्यामध्यें करितें, व आंत कितीएक मजले करून खालच्या मजल्यांत पाणी आलें म्हणजे वरच्यांत चढून वस्ती करितें; घरांत वारा यावा म्हणून वरच्या आंगाला भोंक पाडितें, तें भोंक झाडींत अदृश्य राखितें. पाणनांजराला पोंहतां बरें येतें, आणि पोंहणाऱ्या पक्ष्यांच्या बोटांमधून चामडी जशी जडलेली असती तशी ह्याच्या आहे. ह्याचें आंग लांब आणि पाय आंखूड व बळकट आहेत.

युरोपांत लोक ह्याला बाळगून मासळी धरून आपणापाशीं आणाव यास शिकवितात, म्हणजे हें धन्याच्या कु

टुंबा पुरती मासळी धरिनें, पण दम-
लें म्हणजे त्यांतून त्याला कांहीं मासळी
खायाला दिली पाहिजे.

---

धडा १४

आम्वल.

क्य ग्र च्य ड्य त्त त्य द्व घ द्र र्य
ल्य श्व ष्ट ष्य स्क स्त स्त्य स्म स्व
म्ह ह्य ळ्य.

मनुष्यवस्ती. खिडक्यांस.
कामस्कातृदेल. औषधविद्या.
बावळ्याच्या कानडीस्कड्यां
भीक धष्टपुष्ट. जुत्याचे.

हा पशु हातीं पायीं बळकट असतो, व ह्याचा स्वभाव दुसऱ्या कोणास नमिळावयाजोगा व भयंकर असतो. काळे आस्वल श्वापदें मारून खातात. आणि उदीरंगाची जात आहे ती कंदमूलादिक खाती. जेथें मनुष्य वस्ती पातळ त्या देशांत कांहीं डोंगरी झाडीची जागा - पाहून आस्वल राहातात. युरोपाच्या उत्तरेस, व ग्रीक, व मिसर, व हिंदुस्थान, ह्या देशांत आस्वल सांपडतो, हा थंडीच्या दिवशीं खळगा खणून पुरून घेतो, आणि थंडी उणी होई पर्यंत निजून गहातो. दरवेशीलोक आपलें पोटभरावया साठीं ह्याला रानांतून धरून आणून

लोकांच्या दारोदार फिरवितात, किंवा रस्त्यांत तमाशांतल्यासारिखें नाचवितात, व काठीवर चढवितात. हा आंगानें धष्टपुष्ट असतो, तरी नखांच्या जोरानें ह्याला उंच झाडांवर चढतां येतें.

एशिया खंडाच्या उत्तरेस कामस्कात्केल देशांत बहुत आस्वल आहेत. त्यांचा जातिस्वभाव गरीब आहे. ते फार करून मासळी खातात. तेथलीं माणसें जंगली उनाड आहेत. आणि आस्वल त्यांला फार उपयोगीं पडतात. आस्वलांपासून ते कांहीं औषधविद्या शिकतात, ती अशी कीं त्यांला कांहीं दुःख किंवा रोग झाला म्हणजे तो कोणता झा-

उपाला लाविनो, किंवा खातो; तें पाहून त्यांला उपद्रव झाला म्हणजे ते तोच लावितात व खातात; तोच तमाशाही त्यांचाच पाहून करितात. त्यांला मारून त्यांच्या चांबड्याचें अंथरूण पांघरूण करितात, जुत्याचे तळ त्यांच्या चांबड्याचे करितात, म्हणून गोठलेल्या पाण्यावर चालतांना ते लोक निसरून पडत नाहींत. आस्वलाच्या आंगाची मेंदूत्या लोकांला तेलतुपासारिखी आहे, त्याचें मास ते खातात, आंतडीं तयार करून आरशांच्या ऐवजीं खिडक्यांस लावितात, वाह्कयाच्या मागल्या हाडांच्या कोयत्या करितात, डोकीं घरदाराच्या

भूषणासाठीं लाविनात. रूसलोक केंसा रूद्यां त्यांची कातडीं विकत घेऊन आपल्या साठीं उंची वस्त्रें करितात.



## धडा १५

## पांढरा आस्वल.

ग्र ण्य त्य स्त्य द्र र्ग र्फ ल्य ह्र
स्त्र स्फ स्व ह्म ह्य.

बर्फ. स्पीचबर्गन. मत्स्यादिक.
ग्रीन. समुद्रांतले. ज्ञास्त्रानें.

जेथें बर्फ व गारा नेहमीं असतात. अशा ग्रीनलांड, व स्पीचबर्गेन, ह्या थंड देशांत हा आस्वल सांपडतो.

ह्याचा भक्ष समुद्रांतले मत्स्यादिक कां-हीं जलचर आहेत. ह्याला पोहतां येतें हा समुद्राच्या गोठलेल्या पाण्यावर ज-पणीस बसतो. आसपास जर गलबत आलें तर त्यांत शिरून हा माणसांला मारितो. ह्याचें शरीर साहासात हात लांब असतें, ह्याचें शेंपूट तोंकडें व कें-स लांब आणि नरम असतात.

एका खलाशानें पांढरा आस्वल गोठलेल्या पाण्यावर पाहून बंदुकीनें मारिला. पण नमरतां तो गलबताकडे पाहून येऊं लागला, म्हणून त्यानें फि-रून जखमी केला; तेव्हां दुप्पट रागावून तो गलबतावर चढूं लागला, तें पाहून

खलाशानें शस्त्रानें त्याचा पाय तो-
डून टाकला, तरी तो गलबतावर च-
ढून गेला, तेव्हां गलबतावरचीं माण-
सें शिडावर चढून गेलीं, आणि तेथून
त्यांनीं त्याला बंदुकीनें ठार मारिलें

## धडा १६

## बाजर.

ग्य च्य त्य त्र ध्य प्र र्य ल्य म्ह.
मोठमोठाल्या. मुख्या. प्रकार.

इंग्लंडांत व कांहीं दुसऱ्या यु-
रोपांतील देशांत बाजर सांपडतो हा

रानपशु एकलकोंडा व आळशी आहे, सारादिवस बिळांत निजून राहातो. रात्रींमात्र अंमळसा बाहेर निघतो. हा शेत उकरून नाश करितो, म्हणून लोक रात्रीचे शिकार करून त्याला धरितात. हा बळकट व धीराचा म्हणून आपला जीव वांचवायासाठीं मोठमोठाल्या कुत्र्यांशीं लढाई करतो. त्याचें कातडें कितीएक कामास येतें, आणि त्याच्या केसांची कुंची बांधितात. बाजर मुळ्या व लहान जीव खातो.

त्याची शिकार करावयाचा एक प्रकार असा आहे; बाजर रात्रीं बाहेर गेला, म्हणजे लोक त्याच्या बिळाच्या

तोंडावर जाळें लावितात; तेथें एक मा-
णूस उभा राहातो, दुसरा कुत्री बरोब-
र घेऊन, शेतांत जाऊन, त्याला पिटाळि-
तो, म्हणजे तो बिळांत शिरतांना जा-
ळ्यांत सांपडतो.



## धडा १७

## बीवर.

ख्य च्य ट्ट ळ्य ट्य ण्य त्क त्त त्प
त्य द्य न्न प्य स्क ह्र ल्य स्थ क्ष्य.
आफ्रिका. पर्यंत. उत्पन्न.
चमत्कारिक. जळस्थळांत. घट्ट.
उद्योग. उन्हाळ्यांत. टोप्या.

हें जनावर युरोप, व आफ्रिका व एशिया ह्यांच्या उत्तरेकडे बहुतकरून सांपडतें. बीवर फार शाहाणा असतो. हा आंगमेहनतीनें पाण्यांत चमत्कारिक घरें बांधितो; काठ्या मोडून आपल्या धारेसारिख्या दातांनीं तयार करितो. व भुईंत रोंवितो. लांकडें व माती आणून भिंती घालितो; आणि त्याची शेपटी थापी सारिखी असती, तिनें ठोकून घट्ट करितो. बहुतकरून ह्यांचे कळप असतात. दाहांपासून वीस पर्यंत घरें एकाठायीं जवळजवळ हे बांधितात. उन्हाळ्यांत घरसोडून पाण्याच्या आसपास फिरतात. व झाडींत लपून निज-

तात, आणि जर कांहीं भयउत्पन्न
झालें. तर ह्यांचा कळप पाण्यांत शिर-
तो. थंडीच्या दिवशीं हे बाहेर निघत
नाहींत, आपणास जें खाणें पाहिजे तें
उन्हाळ्यांतच जमवून आपल्या घरांत
ठेवितात. माणसें ह्यांला धरावयाचा उ-
द्योग करितात, ह्याचें कारण हें कीं, ह्यां-
चीं चांबडीं बहुत मोलाचीं असतात,
त्यांच्या साहेबलोकांसाठीं टोप्या आणि
हातांतले मोजे करितात, ह्यांच्या शेंप-
ट्या थपकट्या व रुंद असतात, त्यांज-
वर केंस नसतात खवले असतात.



# धडा १८

## उंदीर.

च्य ण्य त्य त्र न्न र्द र्व र्प ल्य.

शत्रु. दुर्दशा. पाण्यामध्यें.

उंदीर सर्वदेशांत आहेत. हे दा-णा, भाकर, तेल, तूप, खोबरें, चिरगुटें, असे बहुत जिन्नस खातात, म्हणून ह्यांपासून लोकांचा तोटा पुष्कळ हो-तो. ह्यांची संतति लौकर वाढती. हे व-र्षांतून तीन खेपा वितात; दरखेपेस ह्यांला दाहा पंधरा पर्यंत पोरें होतात. जर ह्यांला कोणी शत्रु नसते, तर हे लो-कांच्या संसाराची दुर्दशा करिते, पण

मांजरें, अधेली, व कितीएक दुसरे श-
त्रु ह्यांला वरचेवर उणे करितात. हे लो-
कांचीं घरें पोंखरून आपणास बिळें
करितात; भिंतीवर चढतात; आंधारां-
त ह्यांला दिसतें. युरोपांत ह्यांची एक
जात आहे, ती पाण्यामध्यें पोंहती, त-
ळीं जाती, वरती येती, व मासे, बेडूक,
खाती, दुसरी जात ह्या देशीं चिंचुं
दरी म्हणून आहे. तिच्या आंगाला सु-
वास भारी येतो. अमेरिकादेशांत ही
जात आहे; ह्याचीं कातडीं साहेबलो-
कांच्या टोपीला कामास येतात.



## धडा १९

### खार.

क्य च्य ट्ट त्य ठ्य ज्य त्त त्य
ध्य ल्य म्ह ह्य ळ्य.

हलक्या. दुबेळक्यांत. सुळ्यासारिखें.

खार ही मोठें चपळ जनावर आहे. ही हलक्या आंगाची, व धांवावयास जलद असती. झाडाच्या बुंधापासून धांवत वरती डाहाळ्यांत जाती, ह्या झाडावरून त्या झाडावर उडी मारिती. ही भुईवर फार करून चालत नाहीं, पण हिची एकजात भुईंत बीळ उकरीति, दुसऱ्या जाती झाडा-

ऱ्या दुबेळक्यांत कोटीं करितात. तीं गवत, पानें, काड्या, ह्यांची फारच मजबूद असतात. त्या कोट्यांला वरतीमात्र एक द्वार असतें, आंत पाऊस न जावा म्हणून द्वार मोकळें राखून वंरती एक तिरपी ताटी बांधलेली असती. खारी आपलें खाणें मिळवून झाडाच्या भोंकामध्यें राखितात, आणि जों खाणें बाहेर मिळेल तों त्यांला हात लावीत नाहींत. फळें, बीजें, मिळतनाशीं झालीं म्हणजे आपला सांठा काढून खातात. ह्या नाना प्रकारचीं फळें खातात. ह्यांचे दांत सुळ्यां सारिखे आहेत, म्हणून ह्या बदामें इत्यादिक कठीण

कवंठीचीं फळें फोडून खातात. ह्यांचें आंग मऊ आहे. ह्यांला शेंपटी चांगली शोभा आणती; ती मोठी आणि लांब असून नेहमी फुलविलेली दिसती. ह्यांचे कान घोड्याच्या कानासारिखे उभे राहातात. खार वानरासारिखी बसून हातांनीं खाणें खाती. उत्तरेकडच्या देशांत थंडीच्या दिवशीं ह्यांचे भुरे केंस जाऊन पांढरे येतात. खार लौकर माणसाळती.



# धडा २०

## ससा.

ग्य च्य. ण्य न्त त्य त्र त्व द्द म्र
र्य ल्य ल्ह श्य ह्म.

| | | |
|---|---|---|
| कोल्हा. | प्राणी. | पांढऱ्या |
| लढण्याचे. | त्वरित. | गृहपशू. |
| साहित्य. | भक्ष्य. | पिंजऱ्यांत. |

हें गोजिरवाणें जंगली जनावर आहे. चार, गवत, दाणा खातें. सशां-ला राहावयास सुकी जागा पाहिजे म्ह-णून हे शेतांत किंवा झाडींत जेथें माती भुसभुशीत असेल तेथें उकरून बिळें करितात. घार, कोल्हा, कुत्री, व

अनेक वनपशु, ह्यांला मारितात. ह्यांला बहुत शत्रु असतां ह्यांच्या आंगीं लढण्याचें साहित्य कांहींच नाहीं. पण देवानें ह्यांला लांब कान व उंच डोळे देऊन ह्यांनीं दुरून लौकर ऐकावें, पहावें, असें केलें आहे. हा प्राणी भयामुळें सदां सावध असतो, आणि कांहीं कारण पाहून त्वरित अदृश्य होतो.

कित्तीएक जनावरांस, उत्तर देशांत थंडीच्या दिवशीं, भुऱ्या, काळ्या, व उदी रंगाचे केंस जाऊन पांढऱ्या रंगाचे येतात. सशांसही तसेच येतात. कित्तीएक लोक सशाला धरून गृहपशूसारिखें वागवितात. एकासाहेबाणाशीं स-

सा होता, तो सांजचा साहेबाच्या खो-
लींत खेळत असे. वारंवार साहेबाच्या
हातांतून मौजेनें बूक पाडी, व बहुत
आर्जव दाखवी; पण जर कोणी परका
आला तर भिऊन आपल्या पिंजऱ्यांत
पळून जाई.



## धडा २१

## उंट.

च्य ज्य ण्य त्त त्य ध्य न्म प्र
प्तु म्न र्य र्व ल्ल ल्य व्य, श्व
ष्ण स्त्र स्थ म्ह क्ष्य.

नम्र. उंटाच्या. वर्णनांत.

आर्बस्थान. सर्वप्रकारें. व्यापार.
कसल्याही. निरनिराळ्या. पिशाव्या.

उंटाला चांगला पशु म्हणावें; हा नम्र व भला आहे, आणि भूक तहान सोसून मजला मारितो. आर्बस्थान, आफ्रिका, इत्यादिकांच्या लांब वाळवंटांतून चालतांना पाण्यावांचून चार पांच दिवसपर्यंत राहातो. आणि कांहीं कांटेझाडें, अथवा कसल्याही झाडाच्या शेंगा खाऊन प्रसंगीं शंभर कोस चालतो. हा ओझें चढवितां, व उतरतां, गुडघे टेंकितो; ह्याला असें लोकांनीं न शिकविलें असतें तर शिडी लावावी लागती. कांकीं हा फार उंच

आहे. उंटाच्या कांहीं एका जातीला पाठीवर दोन पोंकें असतात, दुसऱ्याला एक असतें. त्या पोंकाला मदार म्हणतात. आरब लोकांचा व्यापार उंटावरून होतो, आणि सर्वप्रकारें त्यांला हा अनुकूळ आहे. ते लोक ह्याचें दूध पितात, मास खातात, लवेचीं वस्त्रें व कातड्याचीं डवडीं करितात. ईश्वरानें ह्याचे पाय वातड केले आहेत, म्हणून उष्ण वाळवंट खेटतांना त्याला भेगा जात नाहींत. जीं जनावरें रवंथ करितात, त्यांच्या पोटांत निरनिराळ्या पिशव्या असतात; उंट रवंथ करितो, ह्याच्या पोटांत चार पिशव्या आहेत. एकी

मध्यें बहुत दिवस पाणी राहातें. लोकां-ला वाटतें कीं हा खंथ करितांना खाल्लें जसें तोंडांत आणितो; म्हणून ह्याला अन्नोदकावांचून कित्येक दिवस राहवतें. लेंकरांनो तुम्ही ह्या वर्णनांत पाहा, जनावरांस जसजसी सोय पाहिजे तसतसी ईश्वरानें केली आहे; ज्या ठिकाणीं जो पशु माणसाला अधिक उपयोगी पडेल तोच त्या ठिकाणीं त्यानें उत्पन्न केला आहे; ह्यावरून ईश्वर किती ज्ञानी, किती दयावंत, व किती उपकार करणारा आहे, पाहा.



# धडा २२

## हरिण.

ख्य च्य ट्य ड्य त्त त्य न्न र्थ
र्भ र्य र्ष ल्य ष्क म्ह ळ्य.
पुष्कळ. मुख्य. गाडीच्या.
सुर्या. हिंवाळ्यांत. पन्नास.

ह्यांचा कळप रानांत राहातो. हरिण आंगानें हलका, ह्यामुळें चांगला धांवणारा आहे. ह्याजवर पुष्कळ लोक शिकार करितात. ह्यांचीं शिंगें उंच पिळदार पसरलेलीं आणि शोभिवंत आहेत. दरवर्षास ह्याला नवीं शिंगें फुटतात. तीं चाकू सुऱ्या ह्यांच्या

मुठी करावयास उपयोगीं पडतात. हा शिंगांनीं व पुढल्या पायांनी लढाई मारितो. मादीला शिंगें नसतात. हा चार व झाडाचा पाला खातो. ह्याचीच सांबर म्हणून एक जात आहे, तिचीं शिंगें औषधाच्या उपयोगीं आहेत. दुसरीजात लापलांद म्हणून उत्तरेकडे फार थंड एक देश आहे, त्यांत सांपडती. ती त्या लोकांचें मुख्य धन होय. घोडा, गाय, बकरा, मेंढा, हीं जशीं बहुकामी तसा हा सांबर त्यालोकांला आहे, ते ह्याच्या दुधाचा पदार्थ करितात, ह्याचें मास खातात, ह्याच्या कातड्याचीं पांघरुणें, आंतड्यां-

चें सूत, व कमठ्याला दोरी करितात. ह्याच्या शिंगांचा सरस व हाडांचे चमचे करितात. हा हिंवाळ्यांत वर्फ व थंडीनें गोठलेली नदी, ह्यांवरून गाडी चालवितो. त्या लोकांच्या गाड्यांला चाकें नसतात. त्यांचे तळ भुईला सपाट लागून भुईवरून चालतात, त्यांत माणूस आपल्याला बांधून घेतो, आणि हातीं काठी असती, तिनें गाडीच्या वाटेवरून दगड एकीकडे लोटतो. ह्या जातीचे दोन सांबर एकादिवसांत पन्नास कोस गाडी ओढून नेतील.

# धडा २३

## बकरा.

ग्य च्य ड्य ढ्य त्य त्रं ध्य प्र
भ्य र्य क्ल ह्म.

जाग्यावरही. दुसऱ्या. जातीच्या.

बकरा डोंगराच्या कड्यावर चरावयास खुशाल होतो; तेथें ह्या खडकावरून त्या खडकावर टांग मारितो. आणि अगदीं अवघड जाग्यावर ही चढतो. हा डोंगरामध्यें सांपडतो तेव्हां वनपशु सारिखा भ्याड असतो, पण लवकरच माणसाळला होऊन जे त्याला बाळगतात त्यांजकडे प्रीतीनें

राहातो. ह्याच्या दाढीचे केंस लांब अ-
सतात, आणि शिंगें मेंढ्या सारिखीं
खालीं पडत नाहींत, उभीं व कांहीं वळ-
लेलींशीं असतात. हा जेव्हां लढाई क-
रितो तेव्हां मागच्या दोहों पायांवर उभा
राहून शत्रूवर चढून जातो. ह्याला बो-
कड, ह्याच्या पोराला करडूं आणि मादी-
ला शेळी, म्हणतात. शेळीचें दूध चांग-
लें. ही प्रसंगीं दुसऱ्या जातीच्या पोरा-
ला आपलें दूध पिऊं देते. एका शिंगरा-
ची आई मेली होती, त्याला शेळीनें आ-
पलें दूध पाजिलें. ती मौज अशी झा-
ली, दूध पाजते वेळेस शेळी उंच ठि-
काणीं उभी राहात असे, कां कीं पोर

निजपेक्षां मोठें होतें.



## धडा २४

## मेंढा.

क्क च्य ड्य ढ्य त्य द्य द्द ध्य
र्यं र्व ल्य व्ह श्म श्व स्व म्ह.
उपद्रवी. निर्भयपणानें. नव्हे.
तंनुषाघास. सर्वांग. चक्का.

हें गरीब माधें व दुसऱ्यास उपद्रवी नव्हे असें जनावर आहे. मेंढी फार भ्याड आहे, पण जर कोणी तिच्या पोरांला उपद्रव करूं लागलें, तर तिचा स्वभाव अगदीं बदलतो, आणि

निर्भयपणानें ती लढाई करिती. तिचीं पोरें शेतांत मौजेनें उड्या मारितात; लोक त्यांला कोंकरूं किंवा मेंढरूं म्हणतात. मेंढरें कळपांत राहातात; कळपावर शत्रू जर आला तर मेंढ्या, कोंकरें, ह्यांला आंत ठेवून मेंढे त्यांच्या सभोंवतीं आपण वेढा देऊन टक्कर मारून शत्रूला दूर करितात. मेंढ्याचें सर्वांग उपयोगीं पडतें. लोक ह्याच्या लोंकरीचीं कांबळीं व बहुतेक गरम वस्त्रें करितात; चांबड्यानें बुकें, जोडे, बांधितात, आंतड्यांच्या तंतु वाद्यांस तारा लाविनात; दुधाचें चक्का दहीं होतें आणि मासाची सागोती होते

काश्मीरांतल्या व त्याच्या आसपासच्या देशांतल्या मेंढ्यांचें शेपूट फार रुंद असतें, त्याची लोकर फार चांगली. तिची सुंदर शाली इत्यादिक उंच वस्त्रें होतात.



## धडा २५

## बैल.

ह्ल न्क ख्य च्य ट्ट ण्य न

त्य प्य प्र ब्य र्थ र्य र्व र्ष

व्य ष्क स्त स्म

म्ह.

स्मरण. हस्तिदंत. रक्त.
हिरव्या. योग्य. कृति.

बैल मीठा व बळकट पशु आहे, ह्या देशांत हा लोकांचीं पुष्कळ कामें करितो, नांगर ओढीतो, मळणी करितो, राहाट फिरवितो, गाडी चालवितो. हा इतका उपयोगी आहे तरी माणसें उगीच ह्याला दुःख देतात. अहो लेंकरांनो तुम्ही ह्याच्या उपकाराचें स्मरण ठेवून ह्याला दुखवूं नका.

विलायती बैलाला कोळें नसतें ते हिरव्या शेतांत सर्वदा चरतात. लोक त्यांच्या शिंगांच्या डब्या, फण्या, प्याले, सुरांच्या मुठी, व फानसाचीं भिंगें करि-

## धडा २६

## घोडा.

ग्य घ्य च्य ड्य ण्ह च्छ्र त्न
त्य त्र द्द द्र प्र ल्य व्य
व्ह श्च ष्ट ष्ठ स्त्र स्व म्ह
ळ्य.

श्वासोच्छ्वास. तंबूमध्यें. दरिद्री.
प्रतिष्ठा. वस्त्र. द्रव्याकडे.
उद्दाम. यत्न. संतुष्ट.

घोड्याचे केंस बैलाच्या केंसांपेक्षां बारीक व नरम आहेत. ह्याचा आकार फार सुंदर असतो. ह्याचे कान उभे व मानेवर लांब केंस असतात. ह्या-

चा श्वासोच्छ्वास नाकांतूनच येतो. त्याचे खूर एका गेळाचे आहेत. पण अमेरिकेच्या दक्षिण बाजूस एका जातीचे घोडे आहेत, त्यांचे पाय दोहों गेळांचे असतात. खुराला नालबंदी करितात, नाहींतर ह्याचे पाय वाटेवर चालून चालून झिजले असते. हा रथ चालवितो, कंठाक वाहतो, लढाईस व शिकारीस जातो. घोड्यावर बसणें ह्यांत लोकांला प्रतिष्ठा वाटती. लोक ह्याच्या पाठीवर खोगीर ठेवितात, तोंडांत लगाम देतात, मग त्यावर चढून बसतात. हा लगामीच्या स्वाधीन आहे, जिकडे

नी ओढिली तिकडे जातो. ह्याचा स्वभाव चांगला व उद्दाम आहे, ह्याच्या आंगीं बहुत चांगले गुण आहेत. घोडा बहुतकरून देशोदेशीं सांपडतो. इंग्लंडांत ह्यांच्या चांगल्या अनेकजाती आहेत, त्यांला त्यांच्या गुणाप्रमाणें निरनिराळ्या कामास लाविनात. कोणी त्यांला पैजेचें धावणें शिकवून आपल्यापाशीं बाळगतात. आणि घोड्याला असें शिकवावयाविषयीं नेबहुत दुःख देतात, पण हें काम वाईट आहे. आरबी घोडे गुणानें व रूपानें चांगले व जलद असतात. आरब लोक आपल्या तंबूमध्यें त्यांस कुटुं-

बा सारिखे बाळगतात.

एक आरब फार गरीब होता, त्याला वस्त्र आवरण कांहीं नव्हतें. एक सुंदर उमदा घोडा मात्र त्यापाशीं होता. तो विकत घ्यावयास एक फरेंच माणूस यत्न करूं लागला, पण पहिल्यानें आरब विकीना. मग आपण फार दरिद्री जाणून फरेंच माणसाकडे आपला शोभिवंत घोडा घेऊन गेला. तेव्हां त्यानें खुशालीनें सोनें रुपें मोजून ह्याला दिलें. तें हातीं घेऊन घोड्याकडे आणि द्रव्याकडे पाहून आरब म्हणाला "अरे मी तुला कोणाच्या हातीं देतों? हे तुला बांधितील, क-

दाचित् तुला मारितील, असे तुझे हाल करितील, त्या पेक्षां चल घरीं जाऊं आपलीं लेंकरें तुला पाहून संतुष्ट तरी होतील," असें बोलून पैका तेथें भुईवर फेंकून घोडा घेऊन झटकन गेला.



## धडा २७

### गाढव.

क्त ड्य त्य द्र र्क र्य र्व र्ष
ल्य व्य ह्व श्च स्प स्म स्व
म्ह.

स्पेनदेशांत. अकस्मात. द्रव्य.
निरुपकार्याची. आश्चर्य. अशक्त.

गाढव, चार, गवत, दाणा, हे सर्व खातो, परंतु घोड्या सारिखा मिजासी नव्हे. चांगलें खाणें त्याला मिळालें वाह्वा ! नमिळालें तरीं वाह्वा ! हा स्वभावानें गरीब, व ओझें घेऊन मोठी मजल मारावयाला जलद आहे. पद्दा-

डावरून उतरतां किंवा खडकाळां-
त चालतां ह्याचे पाय अडकळत ना-
हींत.

स्पेन देशांत गाढवाची घोड्यासा-
रखी जतन करितात; त्यामुळें तेथले
गाढव सुंदर, उंच, व फार बळकट अ-
सतात, तेथें त्यांचें मोल घोड्यासारिखें-
च आहे.

ह्या देशांत ह्याला बहुधा धोबी,
कुंभार, गांवांतलें खत भरणारे, हे बा-
ळगितात.

एका राजानें आपल्या नगरांत
निरुपकारी माणसास दंड करावा, म्ह-
णून एका कुपणांत मोठी घांट टांगि-

ली; आणि ती घांट जेव्हां कोणी हाल-
वील, तेव्हां पंच बसून निरुपकाऱ्या-
ची पंचाईत करून दंड ठरवावा, अ-
सें केलें, मग तेव्हांपासून त्या कुंपणां-
त कितीएक वर्षे कोणी गेला नाहीं, प-
ण एके दिवशीं अकस्मात् घांट वाजली.
तें आश्चर्य वाटून पंच निरुपकाऱ्याची
चौकशी करूं लागले, आणि पहातात.
तां, एक बिचारा गाढव कुंपणांत गव-
त खात आहे; त्याचा पाय घांटेच्या दो-
रीला अडकून ती वाजत आहे. मग
विचार करतां, हा गाढव एका माणसा-
पाशीं लहानपणापासून पोट बांधून
चाकरी करीत होता, शेवटीं ओझें वाह-

वयाला अशक्त झाला, म्हणून त्यानें का-
ढून दिला, असें समजून पंचांनीं ठर-
विलें, कीं ह्या गाढवाचा यजमान निरु-
पकारी खरा, म्हणून गाढवाच्या पोष-
णासाठीं सरकारास कांहीं त्यानें द्रव्य
द्यावें, असा त्याजवर दंड ठरविला.



# धडा २८

## जेब्रा.

ग्य च्य ण्य क्त त्त त्य द्ध न्न क्र
द्ध ग्र ब्य र्क र्ण र्य ल्यं ह्वं ष्क
स्त स्थ स्व म्ह.

हिंदुस्थानी. परस्वाधीन. मस्ती. चमत्कारिक. शुद्ध. जेब्रे.

जेब्रा म्हणजे एका जातीचा जंगली गाढव आहे. हा आफ्रिका देशांत सांपडतो. हा गाढवापेक्षां दिसण्यांत सुंदर खरा, पण त्याच्या मारिखा माणसाच्या कामकाजास पडत नाहीं. त्यावर एक हिंदुस्थानी म्हण आहे

"देखनेमे ढबू और
चलनेमे शिवराई."

ह्याला आपल्या आहारीं आणावें म्हणून माणसांनीं पुष्कळ यत्न केले, पण ते त्यांचे फुकट गेलें. कां तर हा शुद्ध जंगली आहे, परस्वाधीन राहावयाचा नव्हे; तरी कधीं कधीं ह्यास धरून युरोपांत नेत असत. ह्याचें खाणें चारा. ह्याचा शब्द वर्णवत नाहीं, लोक सांगतात कीं तुतारी सारिखा आहे. केपाच्या आसपास म्हणजे आफ्रिकेच्या दक्षिण सीमेकडे पुष्कळ जेब्रे आहेत. ह्यांला जो कोणीं जिवें मारील त्यापासून नेमलेला दंड घेतात, आणि त्यां-

तून एक जर कोणी धरील तर तो सर-
कारास दिला पाहिजे. जनावर चम-
त्कारिक म्हणून सरकारानें असें ठर-
विलें आहे.

मागें सांगितलेल्या टवर जा-
ग्यांत एक जेब्र्याची मादी होती, ती
कांहीं माणसाळली होती, ती आपल्या
राखणाऱ्याला पाठीवर बसूं देई, आणि
शेंपन्नास हात चाले, पण ती फार मस्ती
करी. कोणी जवळ आला तर त्यास
चावे, आपल्या राखणाऱ्यालाही तसें-
च करी.

---

## धडा २९.

## डुकर.

ग्य. ग्ल घ्र च्य झ्य द्द त्य त्र
त्र्य द्र ह्र प्र र्क र्य र्व ल्य
श्च स्य म्ह.

हट्टी. घ्राणेंद्रियानें. मिनोर्का.
योग्य. पूर्वेस. विद्वान्

हें जनावर मलिन आहे. ह्याला चिखलांत लोळणें आवडतें. लोक सांगतात कीं डुकर हट्टी व खादाड असतो. अरे मुलांनों हे डुकराचे गुण तुम्हांमध्यें नसावे. डुकराला दोन मोठाल्या दाढा आहेत. हा बहुतेक भुईतले पदार्थ

खातो, त्यामुळें तोंडानें भुई उकराव-यास, ईश्वरानें ह्याला योग्य केलें आहे. म्हणजे ह्याची मान आंखूड तोंड लांब व बळकट आणि डोळे तोंडापासून दूर असें केलें आहे. घ्राणेंद्रियानें ह्याला पदार्थाचें ज्ञान दुरून होतें. ह्याची एक जात जंगली आहे, तिला रानडुकर म्हणतात. लोक भाले, बंदुका, आणि कुत्रीं, घेऊन रानांत जाऊन ह्याचा पाठलाग करितात. ह्या कामाचें नांव शिकार. रान डुकर बळकट व धिराचा असतो, शत्रूचें भय धरून पळून जात नाहीं. ह्यांच्या आंगावर हा उडी घालून कुत्रीं, पारधी, ह्यांशीं लढाई करील.

इताली देशांत डुकराच्या शोधा पासून एक उंची खावयाची मुळी सांपडती. तो प्रकार असा, डुकराच्या पायांस दोरी बांधून रानांत सोडतात, मग त्याला त्या मुळीचा वास येऊन खोळंबून तो भुई उकरूं लागतो, तेथें ती मुळी सांपडती. स्पेन देशाच्या पूर्वेस मिनोर्का म्हणून एक बेट आहे, त्यांत डुकरास लहान ओझ्याच्या गाडीला जुंपतात.

ह्याला कांहीं शिकविणें कठीण, पण मौजे साठीं युरोपांत कोणी कांहीं कसब शिकवितात. इंग्लंडांत एक डुकर खुणेनें मूळ अक्षरें दाखवीत असे,

व नानाप्रकारचीं असलीं कामें करी, म्हणून त्याचें "विद्वान् डुकर" असें नांव पडलें. दुसऱ्याला ससाची शिकार शिकविली होती, ती तो कुत्र्यासारिखी करीत असे.



